ऐकोत तुझ्या हि सुखें श्रीगौरी अदिति देवकी लीला ॥ १०२ ॥

॥ श्लोक ॥ त्वां दीन गंगे अति धन्य केला । ध्यातां तुज श्रीपतिकन्यकेला ॥
तूं जेंवि दीनासि असीम हातें । लोकीं न देणार असी महातें ॥ १०३ ॥
तारिले अघ निवारुनि गंगे । सर्व दास मज पावन तातें ॥
दाखवूं चरित कीर्ति करावी । सर्वदा समज पाव नतातें ॥ १०४ ॥
केली तुवां ख्याति महानदीनें । कीं मानिला स्वर्ग लहान दीनें ॥
शंभुत्व विष्णुत्व हि अर्पितीस । ज्ञानामृतें जंतुसि तर्पितीस ॥ १०५ ॥

कळाविद्या जाणे स्तुति करि रसें तो कवि नवी
तदन्य प्रेमें जो प्रिय तुज जसें तोक विनवी ॥
स्तवें भंगे गंगे दुरित समजे हा तव दया
न भी ऐसें चित्तीं तरि नुचलितां हात वद या ॥ १०६ ॥

॥ आर्या ॥ जो सज्जनरंजन सुत दादा मार्गांत पावला मरण ॥
स्मरण धरूनि करावें गंगे त्वां तद्भवव्यथा-हरण ॥ १०७ ॥

॥ दोहा ॥ काढीं जो नतजनमनीं दुःसह तो भवकील ॥
द्युनादि मयूरयशोधनीं हा कृतलोभ वकील ॥ १०८ ॥

॥ आर्या ॥ गुरु माझे श्रीराम श्रीमत्केशव गणेश हरि चववे ॥
यांचा प्रसाद वदला गंगामृत पी यथेष्ट वरि चव वे ॥ १०९ ॥

॥ इति श्रीरामनंदनमयूरविरचित श्रीगंगावकीली संपूर्ण ॥

---

## उपसंहार.

आज पर्यंत आम्हीं मोरोपंतकृत ५४ सुरस प्रकरणें छापिलीं. ह्यांत ग्रंथ सुमारें तीन हजार आला आहे. हीं स्फुट प्रकरणे फारच मनोरंजक आहेत हें वाचकांचे लक्षांत येऊन चुकलें असेलच. ह्या ५४ प्रकरणांत "विष्णुपद-वकीली" व "गंगा-वकीली" हीं ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां फारच महत्वाचीं होत. ह्या दोहोंत पंतांनीं आपले विषयीं कांहीं गोष्टींचा उल्लेख केलेला आढळतो. त्यांचा भाऊ आबाजीपंत होता व भावजय सगुणाबाई होती असें विष्णुपद वकीलीच्या ६८व्या आर्येवरून स्पष्ट होतें. त्यांची स्त्री रमाबाई इनें काशीस जाण्याविषयीं प्रथम प्रेरणा केली असें त्याच प्रकरणाच्या ६९व्या आर्येवरून दिसतें. त्यांचे यजमान बाबूराय जोशी यांस कृष्णराय, पांडुरंगराय, व नीळकंठराय असे तीन पुत्र होते असें गंगावकीलीच्या आर्या ७,८,९ आणि विष्णुपद-वकीलीच्या आर्या १३,१४,१५ यावरून दिसून येतें. ह्या तिघांच्या आया ताई व आबई होत्या असें गंगावकीलीच्या १०व्या आर्येंत सांगितलें आहे. यावरून बाबूराय यांस दोन बायका होत्या असें वाटतें. ह्या प्रकरणाच्या १०व्या आर्येंत बाबूराय याबद्दल

चुकोनें आबूराय असें पडलें आहे. पंतांच्या बाळमित्रांत एक अच्युत नांवाचा मित्र होता असें गंगावकीलीच्या १०व्या आर्यैत आहे गंगाधरपंत पराडकर यानें पंतांस काशीस जाण्याच्या कामीं मदत केल्याचा उल्लेख विष्णुपदवकीलीच्या ४०व्या आर्यैत आहे. ज्या † अमरसिंग जाधवानें पंतांस काशीस नेलें त्याचा उल्लेख गंगावकीलीची आर्या ८५ व विष्णुपदवकीलीची आर्या ३ ह्यांत आहे. त्यांचे चवधे गुरु ह्यांचा उल्लेख गंगावकीलीच्या १०१व्या आर्यैत आहे. काशीस जातांना वाटेंत दादा या नांवाचा पुरुष मृत झाला असें त्याच प्रकरणाच्या १०७ व्या आर्यैत लिहिलें आहे. त्याच प्रकराणाच्या प्रकरणाच्या १३व्या आर्यैत वडील भावाचा, १४व्या आर्यैत चुलत भावांचा, १५ आर्यैत मामेभाऊ गंगाधर व नारायण यांचा उल्लेख आढळतो. बारामतीकर जोशी यांचे मुख्य कारभारी दाजीबा होते असें त्या प्रकरणाच्या १४व्या आर्येवरून होतें. विष्णुपदवकीलीच्या ६७व्या आर्यैत सांगितलेली आका ही बाबूरावाची बहीण असावीसें वाटतें. आपलें निवासस्थान जी बारामती तिचा निर्देश गंगावकीलीच्या आर्या ६०, ६२, ६४, व ७३ ह्यांत पंतांनीं केला आहे. त्यांचे गुरुपुत्र सदाशिव आणि यज्ञेश्वर ह्या नांवाचे होते व त्यांतून सदाशिव हा त्यांचा सहाध्यायी होता असें त्याच प्रकरणाची आर्या ७८ व ७९ ह्यांवरून दिसून येतें. पेशव्यांच्या पदरचे सरदार फडके व रास्ते ह्यांचा उल्लेख आर्या ८७ व ८८ ह्यांत व अहल्याबाई होळकरणीचा आर्या ९० ह्यांत आहे. खुद्द सवाई माधवराव पेशवे ह्यांस विजय प्राप्त व्हावा अशी प्रार्थना आर्या ८९ ह्यांत केली आहे. ८६व्या आर्यैतील नाना हे नाना फडणीस असावेसें वाटतें. २७व्या प्रकरणांत वामन, तुळसीदास, चांगदेव, व निवृत्ति ह्यांचें वर्णन पंतांनीं केलें आहे. शके १६८४*त झालेल्या भक्तविजय ग्रंथाचा कर्ता जो ताहाराबादकर महिपति त्याची स्तुति १८व्या प्रकरणांत आहे. तिच्या ९व्या आर्येवरून महिपतीचा पुत्र विठ्ठल या नांवाचा होता असें दिसतें. १६व्या प्रकरणांत भगवद्गीतेचा भाष्यकार शंकराचार्य व टीकाकार मधुसूदन ह्यांचा उल्लेख ७व्या आर्यैत असून प्राकृत टीकाकार ज्ञानेश्वर व वामन ह्यांचा उल्लेख त्या प्रकरणांत आहे. या आर्येवर आम्ही पूर्वी दिलेली टीप चुकली आहे. ज्ञानेश्वरीची थोरवी त्या प्रकरणाची आर्या १–१० ह्यांत वर्णिली आहे. आठव्या प्रकरणांत पैठणकर एकनाथ स्वामींचें रसाळवर्णन आहे. सारांश हीं ५४ प्रकरणें फार मनोरंजक असून ह्यांत बरीच उपयुक्त माहितीही आहे. पंतांचें चरित्र ह्या ग्रंथारंभीं दिलें आहे त्यांत त्यांच्या गोत्राचा उल्लेख आला नाहीं ह्मणून तत्संबंधीं आर्या एथें दाखल करून हा अल्पलेख आटपतों:—

बा पाव जामदग्न्या ! रामा ! तूं शत्रुमृगकुळीं हरिसा ।
मज तव गोत्रोत्पन्ना पीडिति कामादि नित्य हे अरि सा ॥ १२ ॥

महद्विज्ञापना.

समाप्त.

---

† धनाजी जाधवाचे नातु. यांचे वंशज श्री० शंभुसिंग जाधव माळेगांवकर हे पुणें हायस्कुलांत इंग्रजी अभ्यास करीत आहेत.

* शके सोळाशें चवऱ्यायशी । चित्रभानुनामसंवत्सरासी ॥
वैशाख वद्य द्वादशीसी । ग्रंथ सिद्धीसी पावला ॥ २१५ ॥
प्रवरे पासूनि दक्षिणेस । ताहाराबाद गांव पांच कोस ॥
भक्तविजय अति सुरस । झाला असे ते ठायीं ॥ २१६ ॥ अ० ५७.

भक्तविजय.